**वितरण आदेश क्रमांक- १**
**२००९-२०१०**

स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजनेसाठी
जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना अनुदान.
**विशेष घटक योजनेखाली अनुसुचित**
**जातींच्या लाभार्थ्यांना अर्थसहाय्य२००९-१०**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्रं.स्वग्रायो-२००९/प्र.क्र.१४९ /योजना-३
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२,
दिनांक- २६ ऑगस्ट , २००९

**शासन निर्णय-**

केंद्र शासनाने सन १९९९-२००० पासून ७५ % पुरस्कृत स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना सुरु केली आहे. या योजनेच्या अमंलबजावणीसाठी केंद्र शासनाने त्यांच्या क्र. J- १२०२५/ १/२००९ - SGSY-१ (१३), दि. १६ एप्रिल, २००९ च्या आदेशान्वये राज्यातील जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना सन २००९-१० या आर्थिक वर्षासाठी पहिला हप्ता एकूण रु. ६,५००.४० लाख इतका निधी वितरीत केला आहे.

२. त्यानुसार स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजनेसाठी सोबतच्या विवरण पत्रात दर्शविल्या प्रमाणे सन २००९ - १० साठीचा राज्य हिस्सा **विशेष घटक योजनेखालील लाभार्थ्यांना अर्थसहाय्य रु. ४००.०० लाख (रु. ४ कोटी फक्त)** इतके अनुदान **दि. ऑगस्ट, २००९ रोजी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली(B.D.S) द्वारे** जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना वितरीत करण्यात आला आहे.

३. सदर रकमा संबधीत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहेत. सदर रकमा संबंधित जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणाना अदा करण्याचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना प्रदान करण्यात येत आहेत. त्यांनी संबंधीत जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेस सदर निधी प्रदान करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर खर्च ग्राम विकास व जलसंधारण विभाग मागणी क्रमांक एल-३ "२५०१- ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम **, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम - १०१, स्वर्णजयंती ग्राम स्वयंरोजगार (०१) (०२ ) विशेष घटक योजनेखाली अनुसूचित जातींना अर्थसहाय्य- (२५०१ ०५५८) ३३, अर्थसहाय्य** " या उपलेखाशिर्षाखाली सन २००९-२०१० मध्ये केलेल्या तरतूदी मधून भागवावा.

५. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे.अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल याची अमंलबजावणी करणा-या अधिका-यांनी नोंद घ्यावी.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर प्रकल्प संचालकानी पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांचे कडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम २) कोषागारातून काढलेली रक्कम ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक .

७. सोबतच्या विवरणपत्राद्वारे दर्शविण्यात आलेला निधी वितरीत करण्यात आला असला तरी मंजूर अनुदानाच्या मर्यादेत व केंद्र शासनाच्या निधीच्या समरुप हिश्याच्या मर्यादेत निधी काढण्यात यावा. कोणत्याही परिस्थितीत, मंजूर अनुदानापेक्षा जास्त व केंद्र शासनाच्या निधीच्या समरुप २५% हिश्यापेक्षा जास्त निधी आहरित होणार नाही याची दक्षता घ्यावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रं. **२००९०८२६१३०१०६००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सोबत: वरीलप्रमाणे

( रा. शं. नागरे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पांच जादा प्रतींसह)
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२,नागपूर ( पांच जादा प्रतींसह)
३. विभागीय आयुक्त व त्यांच्या कार्यालयातील उपायुक्त (विकास शाखा), (सर्व) विभाग, ( दोन जादा प्रतींसह)
४.जिल्हाधिकारी, सर्व
५.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद , सर्व.
६.. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा , सर्व.
७. जिल्हा कोषागार अधिकारी , सर्व.
८.नियोजन विभाग ( का. १४४१) मंत्रालय मुंबई-३२.
९. वित्त विभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१६) मंत्रालय मुंबई-३२.
१०. अप्पर संचालक, प्रकल्प आखणी व एकात्मीक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष ( पांच प्रतींसह)
११ कार्यासन अधिकारी, कार्यासन वित्त-७, वित्त-१, योजना-१, योजना-२, योजना-५ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
१२. निवड नस्ती कार्यासन योजना ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

शासन निर्णय क्रं. स्वग्रायो-२००९/प्र.क्रं १४९/ योजना- ३ ,
दि. २६ ऑगस्ट, २००९ चे जोडपत्र (वितरण आदेश क्रं. १ )

**स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना**

**अर्थसंकल्पीय प्रणाली द्वारे (B.D.S) निधी वितरण दि. २६ ऑगस्ट, २००९**

| अ.क्रं | जिल्हा | (01) (02) Subsidy Non Scheduled Castes under Special Component Plan SCP (2501 0558) 33 Subsidy<br>मागणी क्रमांक एल-३ २५०१- ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम , ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम - १०१, स्वर्णजयंती ग्राम स्वयंरोजगार (०१) (०२ ) विशेष घटक योजनेखाली अनुसूचित जातींना अर्थसहाय्य- (२५०१ ०५५८) ३३, अर्थसहाय्य |
|---|---|---|
| १ | २ | ३ (रु. हजारात) |
| १ | ठाणे | १९८०.००० |
| २ | रायगड | ७१८.८५० |
| ३ | रत्नागिरी | ८०४.१०० |
| ४ | सिंधुदुर्ग | ३६०.००० |
| ५ | नाशिक | २१९६.७०० |
| ६ | धुळे | १०८९.००० |
| ७ | नंदुरबार | ६१२.००० |
| ८ | जळगांव | २१५८.२०० |
| ९ | अहमदनगर | ११००.००० |
| १० | पुणे | १७९३.५५० |
| ११ | सातारा | ११८५.८०० |
| १२ | सांगली | ८०४.६५० |
| १३ | सोलापूर | २०२२.९०० |
| १४ | कोल्हापूर | १२७५.४५० |
| १५ | औरंगाबाद | ११२६.९५० |
| १६ | जालना | १०५७.६५० |
| १७ | परभणी | ८४८.६५० |
| १८ | हिंगोली | ६८०.९०० |
| १९ | बीड | १४१२.९५० |
| २० | नांदेड | ११९७.९०० |
| २१ | उस्मानाबाद | ८८७.७०० |
| २२ | लातूर | ११८८.००० |
| २३ | बुलढाणा | ११९७.९०० |
| २४ | अकोला | ९२९.५०० |
| २५ | वाशिम | ११९७.९०० |
| २६ | अमरावती | २३९५.८०० |
| २७ | यवतमाळ | ८३८.७५० |
| २८ | वर्धा | ४३१.२०० |
| २९ | नागपूर | १९६०.२०० |
| ३० | भंडारा | १५५४.८५० |
| ३१ | गोंदिया | १६८३.००० |
| ३२ | चंद्रपूर | ८१४.००० |
| ३३ | गडचिरोली | ४९५.००० |
| | एकूण | ४००००.००० |

( रा. शं. नागरे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

c:\smita\SCP Rel 2009-10 Cr 149.xls